**महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांना विस्तारीकरणासाठी मौजे अंबड, ता. जि. नाशिक येथील ग.नं. ४३ पैकी क्षेत्र २.१४ हे. आर व ग.नं. ७२ पैकी क्षेत्र १३.८६ हे. आर अशी एकूण १६.०० हे.आर शासकीय जमीन विनामुल्य उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.जमीन -३०२४/प्र.क्र.२३८/ज-६**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ०७ ऑगस्ट, २०२४

**वाचा:-**१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र. मशा/कार्या.२/ज-२/ई- १५७७६८९ /२०२४ ,दिनांक ०४.०३.२०२४

२) अपर जिल्हाधिकारी, अहमदनगर यांचे पत्र क्र. मह.कक्ष-३/७-१/कावि/११३/२०२४, दिनांक ०१.०३.२०२४

**प्रास्ताविक:-**

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांना विस्तारीकरणासाठी मौजे अंबड, ता. जि. नाशिक येथील ग.नं. ४३ पैकी क्षेत्र २ हे. १४ आर व ग.नं. ७२ पैकी क्षेत्र १३ हे. ८६ आर अशी एकूण १६.०० हे.आर शासकीय जमीन उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव संदर्भीय पत्रान्वये शासनास सादर करण्यात आला होता. तदनुसार, राज्य शासनाच्या उद्योग, उर्जा व कामगार विभागाने उक्त शासकीय जमीन ही महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या विस्तारीकरणासाठी विनामुल्य मिळण्यासाठी केलेल्या विनंतीनुसार त्याबाबचा प्रस्ताव दिनांक २३.०७.२०२४ रोजीच्या मा. मंत्रिमंडळ बैठकीमध्ये ठेवण्यात आला होता. राज्य मंत्रिमंडळाच्या दिनांक २३.०७.२०२४ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजूरीनुसार शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

राज्य शासनाच्या उद्योग, उर्जा व कामगार (उद्योग) विभागाच्या अधीनस्त महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांना विस्तारीकरणासाठी मौजे अंबड ता.व जि. नाशिक येथील गट ग.नं.४३, क्षेत्र १०.९६ हे.आर. पैकी २.१४ हे.आर. व गट नं.७२, क्षेत्र २७.४२ हे.आर. पैकी १३.८६ हे.आर. असे एकूण ३८.३८ हे.आर. पैकी रू.२४,०२,४०,०००/- (अक्षरी रुपये चोवीस कोटी दोन लक्ष चाळीस हजार ) इतके मुल्यांकन असलेली १६.०० हे.आर. शासकीय जमीन खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून विनामुल्य उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) विषयांकीत जमीन उद्योग, उर्जा व कामगार (उद्योग) विभाग तर्फे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ हे भोगवटादार वर्ग-२ म्हणून धारण करतील.

२) सदर जमिनींचा ताबा आहे त्या स्थितीत उद्योग, उर्जा व कामगार (उद्योग) विभाग तर्फे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांना देण्यात यावा.

३) मंजूर शासकीय जमिनीवर अतिक्रमणे असल्यास ती निष्कासित करण्याची अथवा त्यांची अन्यत्र व्यवस्था करण्याची जबाबदारी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची राहील. तसेच, मंजूर केलेल्या जमिनीचे संरक्षण करण्याची जबाबदारी उद्योग, उर्जा व कामगार विभाग (उद्योग) तर्फे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची राहील.

४) सदर जमिनीखालील सर्व खाणी, खनिज पदार्थ, दगड खाणी या वरील शासनाचे अधिकार राखून ठेवले असून महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील तरतूदीनुसार खाणीचे काम करण्यासाठी, खनिजांचा शोध घेण्यासाठी सर्व वाजवी सोयींसह त्या ठिकाणापर्यंत पोहोचण्याचा अधिकार शासनास राहील.

५) याप्रकरणी कोणताही न्यायालयीन अथवा अन्य कोणत्याही प्रकारचा वाद उद्भवल्यास त्या संदर्भातील सर्व जबाबदारी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची राहील.

६) महसूल व वन विभागाचे कोणतेही व केव्हाही देण्यात येणारे निर्देश सर्व संबंधितांवर बंधनकारक राहतील.

७) सदर जमिनीचा मंजूर प्रयोजनासाठी वापर करणे थांबविल्यास, मंजूर जमिनी महाराष्ट्र शासनास विनामोबदला परत कराव्या लागतील.

८) सदर ज्ञापनातील अटी व शर्ती मान्य असल्याबाबत महामंडळाकडून लेखी हमीपत्र घेण्यात यावे.

९) वरील अटी शर्तीपैकी कोणत्याही अटी शर्तीचा भंग केल्यास शर्तभंगाबाबत सदर शासकीय जमीन शासन जमा करण्याचा अधिकार शासनास राहील.

१०) सदर जमीनी महसूल विभागाकडून महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास मोफत हस्तांतरीत करण्यात येत असल्याने सदरील जमिनीचे हस्तांतरण उद्योगांना करताना जी काही रक्कम महामंडळ आकारते त्याची विभागणी (Revenue Sharing) महसूल व उद्योग विभागात करण्याबाबतचे धोरण पूर्वी मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार उद्योग विभागाने तात्काळ सादर करावे. प्रस्तुत जमीन विनामुल्य वाटप करण्यात येत असल्याने महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने त्यावरील फक्त विकसनाचा खर्च गृहीत धरुन वाटपाचा दर निश्चित करण्यात यावा व त्याचे पालन करणे बंधनकारक राहील.

११) जिल्हाधिकारी, नाशिक यांना आवश्यक वाटतील अशा अन्य अटी व शर्ती विहीत करण्याची मुभा राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०७१५२९२९५३१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SANJAY RAGHUNATH BANKAR

Digitally signed by SANJAY RAGHUNATH BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY RAGHUNATH BANKAR
Date: 2024.08.07 15:48:14 +05'30'

**( संजय बनकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

३) मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

५) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधान भवन, मुंबई
६) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, विधानभवन,मुंबई
७) मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा/ विधान परिषद, महाराष्ट्र, मुंबई
८) विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
९) सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
१०) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
११) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
१२) सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव,मंत्रालयीन विभाग
१३) अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
१४) अपर मुख्य सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
१५) विभागीय आयुक्त,नाशिक विभाग, नाशिक
१६) जिल्हाधिकारी, नाशिक
१७) सहसचिव/उपसचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती (कार्यासन ज-६), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.